**कंत्राटदारांच्या नोंदणीचे सुधारित नियमः**
**आयकर निपटारा प्रमाणपत्राबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
सार्वजनिक बांधकाम विभाग
शासन निर्णय क्रमांक : सीएटी १०९६/प्र.क्र.१७२/इमारती २
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
दिनांक :- २६/९/२००३.

वाचा - १) शा.नि.सा.बां.वि.क्र. सीएटी १०९६/प्र.क्र.१७२/इमारती २,
दिनांक २० एप्रिल,१९९८.
२) शासन परिपत्रक सा.बां.वि.क्र. सीएटी १०९६/प्र.क्र.१७२/इमारती २,
दिनांक २१ सप्टेंबर, २०००.

**प्रस्तावना** -

शासन निर्णय संदर्भाधीन क्र. १ अन्वये कंत्राटदार नोंदणीचे सुधारित नियम निर्गमित करण्यात आले असून, त्यास अनुसरुन संदर्भाधीन क्र. २ च्या शासन परिपत्रकान्वये वर्ग १ मधील कंत्राटदार नोंदणीसाठी वर्ग १ अ, वर्ग १ ब व वर्ग १ क असे उपवर्गीकरण करण्याचे निदेश दिले आहेत. त्यात हे उपवर्गीकरण कंत्राटदारांनी सादर केलेल्या अद्यावत आयकर निपटारा प्रमाणपत्रातील गेल्या ३ ते ५ वर्षातील किमान/लघुत्तम उलाढालीच्या ४.५ पट किंवा कमाल/महत्तम उलाढालीच्या ३ पट यापैकी जी रक्कम अधिक असेल ती रक्कम वर्ग १ मधील उपवर्गीकरणासाठी विचारात घ्यावेत असेही स्पष्ट केले आहे. केंद्रीय अर्थ व कंपनी व्यवहार मंत्रालयाच्या अधिपत्याखालील महसूल विभागाने दिनांक १३ फेब्रुवारी,२००३ च्या पत्रानुसार दिनांक १ जानेवारी,२००३ पासून कंत्राटदारांना आयकर निपटारा प्रमाणपत्र देणे बंद केले आहे. त्यामुळे कंत्राटदार नोंदणी संदर्भात आयकर निपटारा प्रमाणपत्राच्याऐवजी कंत्राटदारांकडून त्यांची उलाढाल दर्शविणारी कुठली कागदपत्रे घ्यावीत याविषयी क्षेत्रीय स्तरावरुन विचारणा करण्यात येत असल्याने, त्या निर्णयाची बाब ही शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय** -

प्रस्तावनेतील पार्श्वभूमी लक्षात घेऊन शासनाने आता खालीलप्रमाणे आदेश देत आहे :-

१) ज्या कंत्राटदारांची वार्षिक उलाढाल रु. ४०.०० लक्षापेक्षा जास्त आहे, अशा प्रकरणी आयकर अधिनियम १९६१ च्या कलम ४४ AB नुसार सनदी लेखापालांकडून (Chartered Accountant) लेखापरिक्षित ताळेबंद ( Audited Balance Sheet) नफ्या तोटयाच्या लेख्यासह (Profit & Loss Account) आयकर निपटारा प्रमाणपत्राऐवजी विचारात घेण्यात यावा.

२) ज्या कंत्राटदाराची वार्षिक उलाढाल रु. ४०.०० लक्षापेक्षा कमी आहे, अशा कंत्राटदारांना आयकर अधिनियम १९६१ मधील कलम ४४ AB अन्वये लेखापरीक्षण अनिवार्य नसल्यामुळे

लेखापरीक्षण करुन घेतले नसेल अशा प्रकरणी स्टेटमेंट ऑफ टोटल इनकम कॉंट्रॅक्ट रिसिप्टसह आयकर विभागास मान्य असलेल्या प्रचलित नमुन्यात सनदी लेखापालाकडून प्रमाणित केलेले असावे.

३) ज्या कंत्राटदारांच्या लेखापरिक्षित ताळेबंदात कंत्राटदाराच्या उलाढालीसंदर्भात काही आक्षेपार्ह माहिती उघडकीस आल्यास, ज्या विभागाकडून प्रस्ताव प्राप्त झाला, त्या विभागाच्या कार्यकारी अभियंत्यांमार्फत संबंधित कंत्राटदारांविरुध्द भारतीय दंड संहितेनुसार योग्य ती कायदेशीर कारवाई करण्यात येईल, तसेच संबंधित सनदी लेखापरीक्षकाविरुध्द उचित कारवाई करण्यासाठी इन्स्टिटयुट ऑफ चार्टर्ड अकाऊंटंट ऑफ इंडिया, नवी दिल्ली यांना कळविण्यात येईल.

४) कंत्राटदाराने वर नमूद केलेल्या कागदपत्रांच्या व्यतिरिक्त आयकर विवरणपत्र दाखल केल्याबाबतच्या पोच पावतीची (Acknoledgement of Income Tax Return Filed) सत्य प्रत सादर करणे आवश्यक आहे.

३. हे आदेश आंतर वित्तीय सल्लागार व उपसचिव आणि पाटबंधारे विभाग यांच्या सहमतीने निर्गमित करण्यात येत आहेत.

हे आदेश निर्गमित झाल्याच्या दिनांकापासून तात्काळ अंमलात येतील.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने.

( शि. वि. तामखडे )
उप सचिव, महाराष्ट्र शासन.

प्रत,

मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव,
मा. मंत्री (सा.बां.)/पाटबंधारे यांचे खाजगी सचिव,
मा. राज्यमंत्री (सा.बां.)/पाटबंधारे यांचे खाजगी सचिव,
वित्त विभाग/सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय,
महालेखापाल-१, मुंबई/महालेखापाल-२, नागपूर,
सचिव (बांधकामे)/सचिव (रस्ते), सार्वजनिक बांधकाम विभाग, यांचे स्वीय सहाय्यक,
सचिव, पाटबंधारे विभाग, मंत्रालय,
सर्व मंत्रालयीन विभाग, मंत्रालय, मुंबई ३२,
सर्व मुख्य अभियंते, सा.बां.विभाग/पाटबंधारे विभाग,
मुख्य अभियंता, बृहन्मुंबई क्षेत्र विकास प्राधिकरण, मुंबई, महाराष्ट्र,
मुख्य अभियंता, गृहनिर्माण व क्षेत्र विकास प्राधिकरण (म्हाडा), मुंबई,
सर्व अधीक्षक अभियंते/कार्यकारी अभियंते, सार्वजनिक बांधकाम विभाग/पाटबंधारे विभाग,
सर्व अधिकारी, सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई ३२, महाराष्ट्र,
निवड नस्ती इमारती २, सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय,मुंबई.

---------